महाराष्ट्र राज्यातील सर्व जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका यांच्या सतत व समवर्ती लेखापरिक्षणासाठी निर्माण केलेली अस्थायी पदे दिनांक ०१/०३/२०१७ ते ३०/९/२०१७ पर्यत चालू ठेवण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मुदत ०२१७/प्र.क्र.४०/२-स,**
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक : २१ एप्रिल, २०१७

<u>वाचा:-</u> १) शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग, क्र राजस १००८/प्र.क्र.५३८/५-स, दिनांक ०५.०५.२०११.
२) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे कार्यालय यांचे पत्र. जा.क्र. आस्थापना/कक्ष-४/जिमस बँक/मुदतवाढ/६८/२०१७, दि. १२/१/२०१७.
३) शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग, क्र मुदत ०२१६/प्र.क्र.८२/२-स, दिनांक २८/१०/२०१६.
४) शासन निर्णय, वित्त विभाग, पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दिनांक. १०/२/२०१७

**<u>प्रस्तावना</u> :-**

संदर्भाधीन शासन निर्णय क्र १ अन्वये सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील स्थायी / अस्थायी पदांच्या आढाव्यानुसार सहकार विभागाचा सुधारीत आकृतीबंध शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. राजस/१००८/ प्रक्र ५३८/५-स, दि. ५ मे २०११ अन्वये निश्चित करण्यात आला असून सदर आकृतीबंधामध्ये प्रस्तुत ४९० पदांचा समावेश आहे. तसेच उपरोक्त संदर्भ क्र ३ अन्वये सर्व जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांच्या सतत व समवर्ती लेखापरिक्षणासाठी निर्माण करण्यात आलेल्या ४९० पैकी १८ कार्यरत व ४७२ पदे रिक्त अस्थायी पदांना दि. २८/२/२०१७ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासनाने मंजूरी दिलेली होती. सदरची मुदत वाढ संपुष्टात येत असल्याने वर नमूद क्र. २ मधील पत्रान्वये ४९० पैकी २६ कार्यरत व ४६४ पदे रिक्त अस्थायी पदे सन २०१७-१८ या कालावधीसाठी पुढे चालू ठेवण्याबाबत ९७ व्या घटनादुरुस्तीच्या अनुषंगाने लेखापरीक्षण विभागास आवश्यकतेनुसार काम करण्यासाठी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे कार्यालयामार्फत प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था. महाराष्ट्र राज्य पुणे, यांच्या उपरोक्त वाचा क्र. २ मधील प्रस्तावानुसार सर्व जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांच्या सतत व समवर्ती लेखापरिक्षणासाठी निर्माण करण्यात आलेल्या ४९० पैकी २६ कार्यरत व ४६४ रिक्त अस्थायी पदांना **दि.०१/०३/२०१७ पासून दि. ३०/९/२०१७ पर्यंत या शासन निर्णयाव्दारे मुदतवाढीस मंजूरी देण्यात येत आहे.**

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | विशेष लेखापरिक्षक वर्ग-१ | १५६००-३९१०० ग्रेड पे ५४०० | २१ |
| २ | विशेष लेखापरिक्षक वर्ग-२ | ९३००-३४८०० ग्रेड पे ४४०० | ०६ |
| ३ | लेखापरिक्षक, श्रेणी-१ | ९३००-३४८०० ग्रेड पे ४३०० | १४ |
| ४ | लेखापरिक्षक, श्रेणी-२ | ९३००-३४८०० ग्रेड पे ४२०० | १५५ |
| ५ | उपलेखापरिक्षक | ५२००-२०२०० ग्रेड पे २४०० | ६८ |

| | | | |
|---|---|---|---|
| ६ | कनिष्ठ लिपिक | ५२००-२०२०० ग्रेड पे १९०० | १९६ |
| ७ | शिपाई | ४४४०-७४४० ग्रेड पे १३०० | ३० |
| **एकूण पदे** | | | **४९०** |

उपरोक्त एकूण ४९० पैकी २६ कार्यरत व ४६४ रिक्त अस्थाई पदाचा होणारा खर्च हा सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मागणी क्र.व्ही-२ मधील अर्थसंकल्पीय लेखाशीर्ष " २४२५- सहकार (००) १०१- सहकारी संस्थांची लेखा परीक्षा- (०१)(ए) लेखापरीक्षेसाठी कर्मचारी वर्ग (२४२५ ०२२७)" या लेखाशीर्षाखाली सन २०१७-१८ या आर्थिक वर्षासाठी केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. परंतू ही अस्थायी पदे विहीत पध्दतीने भरली आहेत या अटीच्या अधीन राहून ही मंजूरी देण्यात येत आहे.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दिनांक. १०/२/२०१७ अन्वये संबंधित प्रशासकीय विभागाना प्रदान केलेल्या मुदतवाढीच्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४२११५४४४०९००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Deepak M Rane

Digitally signed by Deepak M Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMTD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2aef4bf230b6667b08affe7946621e30ca1ff655241ee17d2cbdfd697d7222f5, cn=Deepak M Rane
Date: 2017.04.21 15:48:43 +05'30'

**( दि.म.राणे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल-१, महाराष्ट्र (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) मुंबई.
२) महालेखापाल-२, महाराष्ट्र (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) नागपूर.
३) वित्त विभाग (वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय, मुंबई.
४) वित्त विभाग (व्यय-२), मंत्रालय, मुंबई.
५) कार्यासन अधिकारी, १७-स / ५-स / १२-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय. मुंबई.
६) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७) सहनिबंधक, सहकारी संस्था, (लेखापरिक्षण) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती).
८) सह निबंधक, सहकारी संस्था (लेखा) महाराष्ट्र राज्य सहकारी बँक म., मुंबई
९) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, (सर्व)
१०) विभागीय सहनिबंधक सहकारी संस्था (लेखापरिक्षण) (सर्व)
११) विभागीय विशेष लेखारिक्षक, सहकारी संस्था, मुंबई विभाग, मुंबई.
१२) जिल्हा उप निबंधक, सहकारी संस्था, (सर्व)
१३) जिल्हा कोषागार अधिकारी, (सर्व)
१४) जिल्हा विशेष लेखापरिक्षक, सहकारी संस्था (सर्व)
१५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१७) व्यवस्थापक, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक म. (सर्व)
१८) सर व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक म., मुंबई.
१९) निवड नस्ती.